**केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियान**
**मिरा-भाईंदर शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पातील (सूर्या प्रकल्प) उपांगास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**
**(सन २०१६-१७)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-अमृत-२०१८/प्र.क्र.२१७/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १४ जून, २०१८

वाचा:-

१. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: अमृत २०१५/प्र. क्र.१९७/नवि३३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
२. शासन परिपत्रक क्र. नगर विकास विभाग क्र: अमृत-२०१६/प्र.क्र.१६३/नवि-३३, दिनांक १६ मे, २०१६ व १२ जुलै, २०१६.

प्रस्तावना:-

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाची अंमलबजावणी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सन २०१५-१६ वर्षापासून राज्यामध्ये करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, मलनिस्सारण, पर्जन्यजलवाहिनी, नागरी परिवहन व हरित क्षेत्र विकास इ.पायाभूत सुविधांची निर्मिती अभियान शहरांमध्ये करण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये राज्याच्या रु. २४८९ कोटी किंमतीच्या आराखडयास केंद्र शासनाने मान्यता दिलेली असून सदर आराखडयामध्ये आता मिरा-भाईंदर शहराच्या सुर्या पाणी पुरवठा प्रकल्पाचा समावेश आहे.

**०२.** अमृत अभियानाच्या सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या मिरा-भाईंदर शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पातील (सूर्या प्रकल्प) उपांगाचा समावेश करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाकडून मंजूर केलेल्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या **मिरा-भाईंदर शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पातील उपांगास** संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या अधीन राहून खालील परिच्छेद क्र. २ मधील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

**०३. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत सूर्या पाणी पुरवठा प्रकल्प संकल्पित करण्यात आला आहे. या प्रकल्पाद्वारे वसई-विरार महानगरपालिका व मिरा भाईंदर महानगरपालिका यांना पाणी पुरवठा होणार आहे. यापैकी, वसई-विरार शहरास पाणी पुरवठा करण्याच्या योजनेस शासनाने मान्यता दिली आहे. मिरा-भाईंदर शहरास सुर्या प्रकल्पातून पाणी पुरवठा करण्याच्या प्रकल्पास अमृत अभियानांतर्गत मंजूरी देण्यात येत आहे. सदर प्रकल्पामध्ये खालीलप्रमाणे उपांगांचा समावेश आहे.**

| Sr. No. | Description | Amount (In Cr.) |
|---|---|---|
| 1 | Gravity main from Kashidkopar junction to Chene MBR (1829 mm Dia M.S Pipe, 21.52 km Length) | 148.28 |
| 2 | MBR at Chene For MBMC (45 ML capacity) | 21.10 |
| 3 | Raw Water Pumping Station Machinery | 31.30 |
| 4 | Clear water pumping main 0.315 km + water hammer control device for CWPM | 2.98 |
| 5 | BPT at Suryanagar (1.035 ML capacity) | 1.09 |
| | **Total** | **204.55** |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिल्यापासून २४ महिने** |

**३.** वरील मंजूर उपांगासाठी केंद्र शासनाकडून मंजूर राज्य वार्षिक कृति आराखडयानुसार वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ३३.३३%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या १६.६७%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या ५०%) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मिरा-भाईंदर महानगरपालिका | रु. २०४.५५ कोटी | रु. ६८.२४ कोटी | रु. ३४.१३ कोटी | रु. १०२.३८ कोटी |

**०४.** संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **मिरा-भाईंदर शहराच्या पाणी पुरवठा** प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण** राहील.

४.२ प्रकल्पासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत** भरण्यात यावा.

४.३ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.४ राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीच्या बैठकीतील इतिवृत्तामध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित अभियान शहरांना व कार्यान्वयन यंत्रणांना बंधनकारक राहील.

४.५ केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.६ **निधी वितरणाची कार्यपद्धती:-** केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२०टक्के + ४०टक्के + ४०टक्के) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.७ सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी या प्रकल्पाचे कार्यादेश दिल्यानंतरच वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केलेनंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.८ अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक असणार आहे.

४.९ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१० मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.११ सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१२ प्रकल्पाचे काम सुरु झालेनंतर प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केलेनंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१३ सदर प्रकल्पातील रेल्वेमार्ग/रस्तेमार्ग ओलांडण्यासाठी व अन्य बाबींसाठी आवश्यक ना हरकत प्रमाणपत्रे मिळविण्याबाबतची जबाबदारी कार्यान्वयन यंत्रणेची राहील. तसेच कार्यान्वयन यंत्रणेने या प्रकल्पासाठी आवश्यक सर्व जागा प्रत्यक्ष ताब्यात असल्याची खातरजमा करावी.

४.१४ प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे पाणी पुरवठा कराची आकारणी करण्यास महासभेची मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही मिरा-भाईंदर महानगरपालिकेमार्फत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१४१७३११३८२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.06.19 11:43:59 +05'30'

**(पां.जो.जाधव)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) विभाग यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक.
८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर विकास प्रदेश प्राधिकरण, वांद्रे कुर्ला कॉम्प्लेक्स.
९. अतिरिक्त महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे कुर्ला कॉम्प्लेक्स.
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
११. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
१२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, बेलापूर.
१३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
१४. जिल्हाधिकारी, ठाणे.
१५. जिल्हा प्रशासन अधिकारी, ठाणे.
१६. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका.
१७. अधिक्षक अभियंता, मध्यवर्ती नियोजन संकल्पचित्र व सनियंत्रण, मजीप्रा, ठाणे.
१८. निवडनस्ती, नवि-३३.